सं. सां. क्र. 201606161649209905

शासकीय कर्मचाऱ्यांच्या अपराधसिद्धीच्या कालावधीत निर्वाह भत्त्याच्या प्रदानाबाबत.

महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

परिपत्रक क्रमांक डीआरएस १०८३/सीआर-१५५५/एसईआर-८

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २७ जुलै १९८४

## परिपत्रक

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधि, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून
टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ६८ (२) च्या तरतुदींनुसार शासकीय
कर्मचाऱ्याला एखाद्या सक्षम न्यायालयाने दोषी ठरविले व त्याला कारावासाची शिक्षा दिली तर,
त्याच्या निर्वाह भत्त्याची रक्कम कमी करून अपराध सिद्ध झाल्याच्या तारखेपासून त्याला
नाममात्र दरमहा १ रुपया याप्रमाणे ती देण्यात येते, आणि सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्याला
सेवेतून काढून टाकण्यात येईपर्यंत, किंवा बडतर्फ करण्यात येईपर्यंत, किंवा पुन्हा सेवेत
घेण्यात येईपर्यंत त्याला ही रक्कम मिळत राहते. काही शासकीय कर्मचाऱ्यांनी सदरहू
तरतुदींना सर्वोच्च न्यायालयात आव्हान दिलेले होते. अलिकडेच, सर्वोच्च न्यायालयाने
"महाराष्ट्र शासन **विरुध्द** चंद्रमान तळे", (ए.आय.आर-१९८३/एससी-८०३) या प्रकरणी
असा निर्णय दिला आहे की, पूर्वीच्या मुंबई, नागरी सेवा नियम, १९५९ च्या नियम १५१-
(१) (दोन) (बी) च्या दुसऱ्या परंतुकाच्या [वर उल्लेखिलेल्या नियमावलीचा तत्सम नियम
६८(२)] तरतुदी या विधीअग्राह्य व घटनाबाह्य आहेत आणि निलंबित कर्मचाऱ्यास जरी
न्यायचौकशी न्यायालयाने दोषी ठरविले असले तरी त्याच्या अपराधसिद्धीबाबत त्याने दाखल
केलेल्या अपिलाचा निर्णय लागेपर्यंत, तो नेहमीच्या दराने निर्वाह भत्ता घेण्यास पात्र ठरतो.
सर्वोच्च न्यायालयाच्या या निर्णयानुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधि, स्वीयेत्तर
सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम,
१९८१ च्या नियम ६८(२) मध्ये आवश्यक ती दुरुस्ती करण्याविषयीचा प्रश्न काही काळा-
पासून शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की,
महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधि, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून
काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील पोट-नियम ६८(२) मधील
तरतुदी सोबत जोडलेल्या अधिसूचनेप्रमाणे वगळण्यात याव्यात. तदनुसार, न्यायचौकशी
न्यायालयाने दोषी ठरविल्यानंतरही निलंबनाधीन ठेवलेल्या शासकीय कर्मचाऱ्याने, आपल्या
अपराधसिद्धीबाबत दाखल केलेल्या अपिलाचा निर्णय लागेपर्यंत, त्यास महाराष्ट्र नागरी
सेवा (पदग्रहण अवधि, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे
यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ६८ च्या तरतुदींप्रमाणे अनुज्ञेय असलेला
नेहमीचा निर्वाहभत्ता देण्यात यावा. मग अशा निलंबन कालावधीत तो जामिनावर सुटलेला
असो अथवा कारावासात असो.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधि, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन बडतर्फी
व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ६८(२) च्या
तरतुदी वगळण्याबाबतची अधिसूचना सोबत जोडली आहे.

३. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**व्यं. दे. पानसे,**

**शासनाचे सहसचिव.**

प्रत रवाना :—

महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, एसईआर-८.

*पत्राद्वारे.

---

१९८४ क्रमांक..............

मार्गदर्शनाकरीता प्रत रवाना

*Payment of Subsistence Allowance during the period of conviction of a Government Servant.*

GOVERNMENT OF MAHARASHTRA

**FINANCE DEPARTMENT**

Circular No. DRS-1083/CR-1555/SER-8.

Mantralaya, Bombay 400 032, dated 27th July 1984

*CIRCULAR*

Rule 68(2) of Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981 provides that when a Government servant is convicted by a competent court and sentenced to imprisonment, the subsistence allowance shall be reduced to a nominal amount of Re. 1 per month with effect from the date of such conviction and he shall continue to draw the same till the date of his removal or dismissal or reinstatement by the competent authority. This provision was challenged by some Government servants in the Supreme Court. The Supreme Court, in "State of Maharashtra *vs.* Chandrabhan Tale", (*A.I.R.* 1983 S.C. 803) recently held that the second proviso to Rule 151(1) (*ii*) (*b*) of the then Bombay Civil Services Rules, 1959 [Corresponding to Rule 68(2) referred to above] is void and unconstitutional and that a civil servant under suspension is entitled to the normal subsistence allowance even after his conviction by the Trial Court pending consideration of his appeal filed against his conviction. The question of amending Rule 68 of Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981 suitably in the light of the Supreme Court judgement was under consideration of Government for some time past. Government is now pleased to decide that the provisions of sub-rule 68(2) of Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981 should be deleted as per the Notification enclosed. Accordingly in the case of a Government servant who is continued under suspension even after his conviction by the Trial Court, pending consideration of appeal filed against such conviction, normal subsistence allowance as admissible under rule 68 of Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981 should be paid to him irrespective of fact that during such suspension he is released on bail or is lodged in prison on conviction.

2. A notification deleting the provisions of sub-rule 68(2) of Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981 is appended to this Circular.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V. D. PANSE,

Joint Secretary to Government.

## FINANCE DEPARTMENT

Mantralaya, Bombay 400 032, dated the 27th July 1984.

**278**

CONSTITUTION OF INDIA.

No. DRS-1083/CR-1555/SER-8.—In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981, namely:—

1. These rules may be called the Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) (Amendment) Rules, 1984.

2. In the Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981, in rule 68 sub-rule (2) shall be deleted.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V. D. PANSE,

Joint Secretary to Government.